जिल्हा प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापकीय समितीवर अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.
जिल्हा - उस्मानाबाद.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- पविआ-१०१८/प्र.क्र.२४९/पदुम-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांकः- १६ नोव्हेंबर, २०१८**

वाचा :- (१) कृषि व पदुम विभाग, अधिसूचना क्र. पविआ-२०१४/प्र.क्र.४१४/पदुम ,३- दिनांक १४.०३.२०१७
(२) अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन यांचे कार्यालयीन पत्र क्र. एसएलटी / कायदे / ३०८ / १३४७०-७३ / २०१८ / पसं-१२, औंध, पुणे-६७, दि. ११.१०.२०१८
(३) जिल्हाधिकारी, सोलापूर यांचे क्र. जिपउआ/आस्था/१६२२/२०१८,उस्मानाबाद दिनांक १९.४.२०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या प्राणी क्लेष प्रतिबंधक अधिनियम, १९६० मधील तरतुदींची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्हयामध्ये प्राणी क्लेष प्रतिबंधक (प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी स्थापना व नियमन) नियम, २००१ च्या नियम ३ मधील तरतुदीनुसार संदर्भाधीन दिनांक १४ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेन्वये सर्व जिल्ह्यांमध्ये प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापकीय समित्यांची स्थापना करण्यात आली आहे. सदर व्यवस्थापकीय समितीवर गोशाळा/ पांजळपोळ संस्थेचे अध्यक्ष, प्राणी विषयक कार्य करणारे सेवाभावी संस्थेचे सदस्य, सर्वसाधारण समितीने नामनिर्देशीत केलेल्या व्यक्ती आणि मानवहीत कार्य करणारे / प्राण्यावर प्रेम करणाऱ्या व्यक्ती इ. क्षेत्रात कार्य करणाऱ्या व्यक्तींची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांच्याकडून प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेवून सदर्भाधीन दिनांक १४/०३/२०१७ अधिसूचनेतील खंड (क) (३) येथील तरतूदीनुसार उस्मानाबाद जिल्ह्यातील प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापन समितीवर खालील व्यक्तींची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. सदर अशासकीय सदस्य पदाचा कार्यकाळ नियुक्तीच्या दिनांकापासून तीन वर्षे राहील.

| अ. क्र. | अशासकीय सदस्याचे नांव | क्षेत्राचे नांव | पदनाम |
|---|---|---|---|
| १ | श्री. रंगनाथ विश्वनाथ दुधाळ, रा.येरमाळा (दुधाळवाडी), ता.कळंब, जि.उस्मानाबाद. | संबंधित जिल्ह्यातील गोशाळा/ पांजरपोळ संस्थांपैकी एका संस्थेचा अध्यक्ष. | अशासकीय सदस्य |
| २ | श्री. श्रीनिवास बळीराम माळी (फुलसुंदर) रा.लोहारा (बु), ता.लोहारा, जि.उस्मानाबाद. | प्राणी कल्याणविषयक कार्य करणाऱ्या सेवाभावी संस्थांचे दोन सदस्य. | अशासकीय सदस्य |
| ३ | श्री. उस्मान खैरोद्दिन कुरेशी, रसुल पुरा खिरणी मळा, रा.उस्मानाबाद, जि.उस्मानाबाद | संबंधित जिल्ह्यातील मानवहितकारक कार्य करणारे/ प्राणी कल्याणासाठी कार्य करणारे कार्यकर्ते. | अशासकीय सदस्य |
| ४ | श्री. विजयकुमार बेदमुथा, ३/११, भगवान महावीर पथ, पोस्ट बॉक्स नं.१, जि.उस्मानाबाद. | | अशासकीय सदस्य |
| ५ | श्री. नितीन विलास तांबीले, रा.वडनेर, ता.परांडा, जि.उस्मानाबाद | | अशासकीय सदस्य |
| ६ | श्री.आऋबा श्रीपती कोळेकर, मु.कोळेकरवाडी, पो.बुकनवाडी, ता.जि.उस्मानाबाद. | | अशासकीय सदस्य |
| ७ | श्री.विनोद सोमनाथ कुलकर्णी, मु.पो.उमरेगव्हाण, ता.जि.उस्मानाबाद. | | अशासकीय सदस्य |

३. अ.क्र.६ व ७ येथील २ व्यक्तींचा चारित्र्य पडताळणी अहवाल अनुकूल प्राप्त होण्याच्या अटीच्या अधिन राहून उस्मानाबाद जिल्ह्यातील प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापकीय समितीवर अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१११६१८०१०१८५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2018.11.17 13:15:12 +05'30'

**(विकास तु. कदम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. अपर मुख्य सचिव, (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७.
५. अतिरिक्त आयुक्त, पशुसंवर्धन तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र प्राणी कल्याण मंडळ, पुणे.
६. मा. मंत्री (पदुम), यांचे खाजगी सचिव
७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
८. महाव्यवस्थापक, देवनार पशुवधगृह, मुंबई.
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
११. सर्व प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन.
१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त
१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. उस्मानाबाद जिल्ह्यातील प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापन समितीचे सर्व अशासकीय सदस्य
१६. निवड नस्ती.